**<u>तात्पुरत्या/हंगामी पोलीस पाटलांना कायम नियुक्ती देण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीव्हीपी ०१११/प्र.क्र. ३/पोल-८

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २८ जून, २०११.

**<u>प्रस्तावना</u>** : मा. राज्यमंत्री (गृह) यांनी पोलीस पाटलांच्या प्रलंबित मागण्यांवर चर्चा करण्यासाठी दि. ११ जानेवारी, २०११ रोजी बैठक आयोजित केली होती. या बैठकीत पोलीस पाटलांच्या अनेक मागण्यांवर चर्चा करण्यात आली. "तात्पुरत्या पोलीस पाटलांना कायम करावे." अशी संघटनेची एक प्रमुख मागणी आहे. संघटनेने या संदर्भात जी भूमिका मांडली त्यात असे स्पष्ट करण्यात आले की, महाराष्ट्र ग्राम पोलीस पाटील (सेवा प्रवेश, पगार भत्ते आणि सेवेच्या इतर शर्ती) आदेश, १९६८ मधील कलम ६ अन्वये ज्या गावातील पोलीस पाटील निवृत्त झाला असेल, निलंबित झाला असेल, मयत झाला असेल किंवा त्या गावामधील पोलीस पाटील नाही आणि असे गाव संवेदनशील बनले असेल तर, त्या गावची शांतता, सुव्यवस्था राखण्याकरीता तालुका दंडाधिकारी यांना तात्पुरत्या/हंगामी पोलीस पाटील यांची दोन महिन्याकरीता नियुक्ती करण्याचे अधिकार आहेत. त्यानुसार सिंधुदूर्ग, सांगली, सोलापूर आणि रत्नागिरी या चार जिल्ह्यांमध्ये मागील कालावधीमध्ये हंगामी पोलीस पाटलांच्या नेमणूका करण्यात आल्या आहेत. यामध्ये बरेच पोलीस पाटील ५ वर्षे ते ३५ वर्षापर्यंत हंगामी पोलीस पाटील म्हणून सेवा करुन निवृत्त झाले आहेत. या चार जिल्ह्याव्यतिरिक्त महाराष्ट्रात कोठेही हंगामी पोलीस पाटलांच्या नियुक्त्या झालेल्या नाहीत. शा.नि. गृह विभाग क्र. बिव्हीपी ०५१०/प्र.क्र. २०१/पोल-८, दि. १४ जून, २०१० अन्वये हंगामी पोलीस पाटील नेमणूकीचे तालुका दंडाधिकाऱ्यांना असलेले अधिकार काढून उपविभागीय दंडाधिकाऱ्यांना देण्यात आले आहेत. त्याचबरोबर नियमित नियुक्ती केलेल्या किंवा मुदतवाढ दिलेला पोलीस पाटील निलंबित किंवा रजेवर असेल तर, निलंबन किंवा रजा संपेपर्यंत दोन महिन्याच्या खंडानंतर दोन-दोन महिन्याकरीता तात्पुरती नियुक्ती करता येईल. इतर कोणत्याही कारणामुळे पद रिक्त असेल तर, केवळ एकदाच दोन महिन्याकरीता तात्पुरती नियुक्ती देता येईल. अशा प्रकारचा निर्णय घेण्यात आला आहे. त्या निर्णयामुळे हंगामी पोलीस पाटील म्हणून ५ ते २० वर्षे ज्यांनी सेवा केलेली आहे, त्यांना नियुक्त्या देणे बंद केले आहे. हंगामी पोलीस पाटील म्हणून २ वर्षापेक्षा अधिक कार्यरत असलेल्या, नियुक्तीसाठीच्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणाऱ्या पोलीस पाटलांना पोलीस पाटील पदावरील नियुक्तीसाठी प्राधान्य देण्याचा निर्णय शा.नि. दिनांक २७ ऑगस्ट, २०१० अन्वये घेण्यात आला आहे. तथापि, हंगामी पोलीस पाटील म्हणून ज्या व्यक्तीने ५ ते २० वर्षापर्यंत सेवा केली असेल, अशी व्यक्ती पोलीस पाटील नियुक्तीसाठी विहित केलेल्या वय, शिक्षण व आरक्षण इत्यादी अटींची सध्या पूर्तता करु शकणार नाहीत, यास्तव अशा हंगामी पोलीस पाटलांना कायमस्वरुपी पोलीस पाटील म्हणून नियुक्ती देण्यात यावी, अशी पोलीस पाटील संघटनेने मागणी केली होती. लोकप्रतिनिधींकडूनदेखील हंगामी पोलीस पाटलांना कायम करण्याची सातत्याने मागणी करण्यात येत होती. या सर्व बाबींचा विचार करुन, सोलापूर, सांगली, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग या चार जिल्ह्यांकडून हंगामी पोलीस पाटलांबद्दलची माहिती मागविण्यात

आली. त्यामध्ये सांगली व्यतिरिक्त अन्य तीन जिल्ह्यांमध्ये हंगामी पोलीस पाटलांच्या नियुक्त्या करण्यात आल्याचे आढळून आले. त्यानुसार या तीन जिल्ह्यातील हंगामी पोलीस पाटलांना कायम नियुक्ती देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** : वरील प्रस्तावाचा सर्वांगिण विचार करुन, शासनाने सोलापूर, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग या तीन जिल्ह्यात नेमलेल्या हंगामी पोलीस पाटलांपैकी ज्या हंगामी पोलीस पाटलांनी दोन वर्षापेक्षा अधिक सेवा केली आहे, अशा हंगामी पोलीस पाटलांना एक विशेष बाब म्हणून, प्रथम नियुक्तीसाठी विहित केलेले वय, शिक्षण यातून सूट देऊन, या पोलीस पाटलांना प्रथम पाच वर्ष किंवा वयाची ६० वर्षे पूर्ण होईपर्यंत यापैकी जे अगोदर पूर्ण होईल, तोपर्यंतच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून, प्रथम नियुक्ती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१. ज्या ज्या हंगामी पोलीस पाटलांनी, कायम नियुक्ती मिळण्याकरीता शासनाविरुध्द न्यायालयात दावे दाखल केले आहेत, ते त्यांनी विनाशर्त मागे घेणे बंधनकारक राहील.

२. हंगामी पोलीस पाटलांनी शासनाविरुध्द दाखल केलेले सर्व दावे मागे घेतल्याबद्दलची कागदपत्रे संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना सादर करावीत. प्राप्त कागदपत्रांची तपासणी करुन, त्यांच्या जिल्ह्यातील हंगामी पोलीस पाटलांनी शासनाविरुध्द दाखल केलेले सर्व दावे मागे घेतल्याबाबतची खातरजमा जिल्हाधिकारी करतील. तद्नंतर हंगामी पोलीस पाटलांनी मागे घेतलेल्या दाव्यांबद्दलची खातरजमा केल्याचे, जिल्हाधिकारी त्यांच्या अधिनस्त सर्व उपविभागीय अधिकाऱ्यांना कळवतील.

३. त्याचप्रमाणे हंगामी पोलीस पाटलांना कायम नियुक्ती दिल्याने कोणत्याही न्यायालयीन निर्णयाचा अवमान होणार नाही, याची खातरजमा जिल्हाधिकाऱ्यांनी करावी.

४. जिल्हाधिकाऱ्यांनी वरीलप्रमाणे कळविल्यानंतर संबंधित उपविभागीय दंडाधिकारी :-

अ) त्यांच्या उपविभागात दोन वर्षापेक्षा जास्त हंगामी पोलीस पाटील म्हणून सेवा केलेल्या पोलीस पाटलांची यादी तयार करतील. (दोन वर्षापेक्षा अधिक म्हणजे ज्या पोलीस पाटलांना तहसिलदार/उपविभागीय दंडाधिकारी यांनी दोन-दोन महिन्याच्या कमीत-कमी तेरावेळा नियुक्त्या दिलेल्या आहेत व या नियुक्तीच्या कालावधीत हंगामी पोलीस पाटलांनी प्रत्यक्ष काम केले आहे, अशा हंगामी पोलीस पाटलांची उपविभागीय दंडाधिकारी प्रथम यादी तयार करतील.)

ब) यादी निश्चित केल्यानंतर उपविभागीय दंडाधिकाऱ्यांनी यादीतील हंगामी पोलीस पाटलांची, स्थानिक पोलीस स्टेशनकडून चारित्र्य पडताळणी करुन घ्यावी. स्वच्छ व निष्कलंक चारीत्र्य असणाऱ्या पोलीस पाटलांचा पुढील कार्यवाहीसाठी विचार करावा.

क) प्रथम हंगामी नियुक्तीच्यावेळी, पोलीस पाटील नियुक्तीसाठी शासनाने विहित केलेल्या वय, शिक्षण इत्यादी अटींची सदर हंगामी पोलीस पाटील पूर्तता करीत असल्याबद्दलची खातरजमा उपविभागीय दंडाधिकारी यांनी करावी.

ड) उपविभागीय दंडाधिकाऱ्यांनी, त्यांच्या उपविभागातील पोलीस पाटील भरतीसाठी शासन निर्णय दि. १६.१०.२००८ अन्वये आरक्षण निश्चित केले असेल आणि सध्या त्याठिकाणी हंगामी पोलीस पाटील म्हणून सेवा केलेल्या पोलीस पाटलास कायम नियुक्ती देण्यामध्ये आरक्षणाबद्दलची अडचण येत असेल तर, त्यातून सूट देऊन हंगामी पोलीस पाटलाची त्याठिकाणी कायम पोलीस पाटील म्हणून नियुक्ती करावी. तद्नंतर उपविभागातील भरलेल्या व रिक्त जागा विचारात घेऊन शासन निर्णय दि. १६.१०.२००८ अन्वये फेर आरक्षण निश्चित करावे.

इ) हंगामी पोलीस पाटलांना ज्या दिनांकापासून कायम नियुक्ती देण्यात येईल, त्या दिनांकापासून पुढे कायम नियुक्तीसाठीचे लाभ अनुज्ञेय राहतील.

ई) शासन निर्णय, गृह विभाग क्र. बीव्हीपी-०५१०/प्र.क्र.२०१/पोल-८, दि. १४.६.२०१० अन्वये विहित केलेल्या प्रयोजनाव्यतिरिक्त, अन्य प्रयोजनाकरीता उपविभागीय दंडाधिकाऱ्यांनी हंगामी पोलीस पाटलांच्या यापुढे नियुक्त्या करु नयेत. जर, या आदेशातील कारणाव्यतिरिक्त अन्य कारणांकरीता हंगामी पोलीस पाटलांच्या नियुक्त्या करण्यात आल्या तर, त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित उपविभागीय दंडाधिकाऱ्यांवर राहील व ते शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र राहतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०६२८१५५३१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(शहाजहान मुलाणी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व पोलीस अधीक्षक.
सर्व उपविभागीय दंडाधिकारी (जिल्हाधिकाऱ्यांमार्फत)
निवडनस्ती (आस्था-३)
निवडनस्ती (पोल-८)